**महाराष्ट्रातील बांबू क्षेत्राचे सशक्तीकरण करण्यासाठी "बांबू प्रवर्तन प्रतिष्ठान, महाराष्ट्र" या कंपनीची स्थापना करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक बांबूसा-२०१७/प्र.क्र.६८/फ-९**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २४ ऑगस्ट, २०१८

वाचा:- १) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांक बांबूसा-२०१५/प्र.क्र.२४१/फ-९, दिनांक २४.०७.२०१५
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांक बांबूसा-२०१५/प्र.क्र.१३९/फ-९, दिनांक ०६.०८.२०१६

प्रस्तावना:-

नवीन बांबू धोरण व्यापक व सर्वसमावेशक करण्यासाठी दिनांक २४ जुलै, २०१५ च्या शासन निर्णयान्वये प्रधान सचिव, ग्राम विकास विभाग यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्यात आली होती. सदर समितीने जानेवारी, २०१७ मध्ये त्यांच्या शिफारसी शासनास सादर केलेल्या आहेत. सदर शिफारसी शासनाने मान्य केल्याआहेत. सदर शिफारसीं पैकी काही शिफारशींवर यापूर्वीच शासनाकडून धोरणात्मक निर्णय घेण्यात आलेले असून, शिफारस क्र. २.५ मध्ये बांबू सेक्टरच्या विकासासाठी बहु भागधारकांची संघटना निर्माण करण्याचे नमूद केले आहे. तसेच माननीय मंत्री(वित्त आणि नियोजन, वने) यांनी दिनांक १८.०३.२०१७ रोजी विधानमंडळासमोर महाराष्ट्राचा सन २०१७-१८ चा सर्वसाधारण अर्थसंकल्प सादर करताना बांबू सेक्टरच्या विकासासाठी महाराष्ट्र राज्य बांबू प्रवर्तन यंत्रणा स्थापित केले जाईल अशी घोषणा केलेली आहे. यासाठी विश्वासार्हता असलेल्या व इच्छुक कंपन्यांना सदर कंपनी स्थापनेत सहभागी होण्यासाठी विहीत कार्यप्रणालीचा वापर करण्याचे निश्चित करण्यात आले. याकरीता विभागाकडून Expression of Interest मागविण्यात आले. यामध्ये टाटा ट्रस्ट यांनी रु.५.०० कोटी पर्यंत अर्थसहाय्य देण्याची हमी दिल्यामुळे त्यांच्या सोबत भागीदारीत कंपनी सुरु करण्याबाबतचा प्रस्ताव विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

राज्यातील बांबू क्षेत्राचे सशक्तीकरण करण्यासाठी महाराष्ट्र शासन आणि टाटा ट्रस्ट यांच्या भागिदारीने नफा पायाभूत नसलेल्या कंपनीची म्हणजे **"बांबू प्रवर्तन प्रतिष्ठान, महाराष्ट्र"** (Bamboo Promotion Foundation, Maharashtra) या कंपनीची स्थापना करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**कंपनीचे नांव**:-

**बांबू प्रवर्तन प्रतिष्ठान, महाराष्ट्र (Bamboo Promotion Foundation, Maharashtra)**

बांबू प्रवर्तन प्रतिष्ठान,महाराष्ट्र या कंपनीचे मुख्यालय बृहन्मुंबई क्षेत्रात (एमएमआरडीए) येथे राहील.

**कायदेशीर स्थिती /दर्जा**

बांबू प्रवर्तन प्रतिष्ठान, महाराष्ट्र ही कंपनी, कंपनी अधिनियमाच्या कलम ८ खाली तयार झालेली नफ्यासाठी नसणारी कंपनी असेल. कंपनीकडे अतिरिक्त असणारी रक्कम वितरीत न करता फक्त कंपनीच्या उद्दिष्ठासाठी वापरली जाईल.

**कंपनीचे मुख्य उद्देश**

बांबू उद्योगास चालना देणे हे कंपनीचे मुख्य उद्दिष्ट असेल. या सेक्टरमध्ये रोजगाराकरीता उपजिविकेची संधी निर्माण करणे यास प्राथमिकता असेल.

**कंपनीचे स्वरूप**

सदर कंपनी, कंपनी अधिनियमाच्या कलम २ (६८) नुसार गॅरंटीद्वारे मर्यादित कंपनी असेल. याचा अर्थ कंपनीसाठी कोणतेही भागभांडवल असणार नाही. कंपनीचे कार्य हे अनुदान, योगदान आणि सेवा शुल्काच्या व इतर उत्पन्नावर चालेल. यामध्ये शासनासह टाटा ट्रस्ट हे संस्थापक सदस्य राहतील. सदर कंपनीमध्ये भविष्यात सहभागी होण्यासाठी आवश्यक Association of Articles मधील शासन अटी व पात्रता पूर्ण करणा-या इच्छुक नामांकित कंपन्यांना शासन मान्यतेने सहसभासद म्हणून घेता येईल.

**कंपनीच्या कार्याचे स्वरूप**

कंपनी, शेतकरी आणि शेतकरी संघटना, शासकीय विभाग, को-ऑपरेटीव्ह, बांबू व्यवसायिक उद्योजक, रोपवाटीकामालक, ट्रस्ट, बचत गट (SHG), शैक्षणिक संस्था, वास्तुशिल्प तज्ञ, डिजाईनर आणि इतर हे भागीदारीत कार्य करतील. सदर कंपनी ज्ञान आणि तांत्रिक भागीदारी स्वरूपात कार्य करेल, त्यामुळे कंपनीचा स्वता:चा खर्च खूपच मर्यादीत राहण्याची अपेक्षाआहे. कारण हा लहान पथदर्शी प्रकल्प वगळता थेट प्रचालनात (operation) प्रत्यक्षपणे काम करणार नाही.

बांबू प्रवर्तन प्रतिष्ठान, महाराष्ट्र या कंपनीद्वारे करण्यात येणारी कामे वनहक्क कायदयातील तरतुदी व अनुसूचीत क्षेत्रातील कायदेशीर तरतुदींशी विसंगत राहणार नाही, याची दक्षता घेण्यात येईल.

कंपनीचे संस्थापक सदस्यामधून देणग्या-अनुदान तसेच व्यवसायिक सामाजिक जबाबदारी (सीएसआर) आणि शासनासह भागीदार संस्था कडून प्रकल्पासाठी प्राप्त होणा-या अनुदानातून कार्यरत राहील. कंपनीचा पहिल्या तीन वर्षाचा कर्मचारी आस्थापना व प्रशासकीय खर्च कॉर्पस निधी किंवा सेवाशुल्क याद्वारे भागविला जाईल.

पहिल्या तीन वर्षात कंपनीत केवळ १०-१५ कर्मचारी कार्यरत असणार आहेत. बांबू ही नैसर्गिकरीत्या जलद वाढणारी प्रजाती आहे. त्यामुळे कंपनीच्या कार्यामुळे त्याचा प्रभाव पुढील ३-५ वर्षानंतरच लक्षणीय स्वरुपात दिसून येईल. कंपनीच्या स्थापनेमुळे व कार्यामुळे बांबू क्षेत्राचे सशक्तीकरणाचे मुल्यमापन ७ वर्षानंतरच करता येईल. सध्याच्या योजना चालू असतांना कंपनीचे दोन-तीन वर्षात स्वत:चे आर्थिक आणि परिचालन मॉडेल विकसित होईल.

**कंपनीच्या कार्याची प्राथमिकता.**

१. **संघटीत बांबू बाजारास चालना देणे:-**
सद्यस्थितीत शेतकरी समर्पित क्षेत्रात बांबूची लागवड करतात. यामध्ये प्रमुख्याने गटलागवड, बांधावरची लागवड अर्तंभूत आहे. त्यांना त्याच्या क्षेत्रात उत्पादित होणाऱ्या बांबूसाठी निश्चित किती किंमत मिळेल ते माहित नसते. तसेच त्यांना कोणत्या साप्ताहिक बाजारपेठेत बांबू विकला जाऊ शकतो याचे ज्ञान नसते.बांबूला जास्तीत जास्त किंमत मिळण्यासाठी त्याची विक्री कोठे करावी याबद्दल सुध्दा माहिती नसते. बांबू साठी खात्रीशीर किंवा संघटीत बाजारपेठ उपलब्ध नाही, ही वस्तुस्थिती आहे.या समस्येवर उपाय म्हणून बांबूकरिता लहान बाजारपेठ / सुलभ केंद्रे सुरु करण्यात येतील, जी खरेदीदार व विक्रेता यांच्यासाठी मध्यस्थी म्हणून सेवा पुरवेल.बांबूची प्रतवारी, त्यावरील मूल्यवर्धनासाठी आवश्यक प्रक्रिया तसेच त्याच्या आगावू किंमती जाहीर करतील. एकदा हे मॉडेल स्थापित झाल्यानंतर स्थानिक शेतकऱ्यांमध्ये बांबू लागवड, बांबू शेती विषयक निश्चितपणे आकर्षण निर्माण होईल आणि त्या भागामध्ये बाजारपेठेत मोठया प्रमाणात उलाढाल सुरु होईल. याकरिता पहिल्या ३ वर्षात कंपनीकडून ५ केंद्रे उघडली जातील.

२. **बांबूच्या तीन क्लस्टर्सचे उत्पादन, डिझाईन आणि विक्री:-**
सुमारे १० ते १५ गांवाचा एक संक्षिप्त क्लस्टर (२५ किलोमिटरच्या त्रिज्येत) ओळखला जाईल. क्लस्टर मध्ये आधीपासूनच उत्तम कच्चा माल, कौशल्य किंवा बाजारपेठेला सहाय्य

अशा प्रकारचा संबंध बांबूशी असणे आवश्यक आहे. बांबू कौशल्य प्रशिक्षण, उत्तम बाजारपेठेची गुणवत्ता आणि प्रमाण वाढवून बांबू सेक्टरचे एकत्रीकरण व मजबूतीकरण केले जाईल.क्लस्टर ॲक्शन योजना सविस्तर विश्लेषणाद्वारे तयार केली जाईल. आवश्यक तेथे सामान्य सुविधा केंद्र सुरु करण्यात येईल.

**३. पेसा गावामध्ये बांबूचे मूल्यवर्धन व उत्पन्न वाढवणे:-**

ऐतिहासिक पेसा कायदयामुळे अनुसूचित क्षेत्रातील वनाचे व्यवस्थापन करण्याचा अधिकार स्थानिक लोकांना प्राप्त झालेला आहे. त्यामुळे या समुदायाजवळ व्यवस्थापनासाठी असलेल्या क्षेत्रात प्रचंड प्रमाणात बांबू उपलब्ध आहे. गडचिरोली जिल्हयात ब-याच गावांनी बांबूचे निष्कासन करुन त्याची थेट विक्रीकंत्राटदारांना सुरु केली आहे. त्यामुळे त्यांच्या उत्पादनात मागील काही वर्षामध्ये भरघोस वाढ झाली आहे. तथापि बांबूची निरंतर निष्कासन त्यासाठी जास्तीत जास्त किंमत कशी प्राप्त करुन घ्यावी, यासाठी मूल्यवर्धन कसे केले जाईल याअनुषंगाने कंपनी कार्य करेल.

**४. घरबांधणी म्हणून बांबूचा वापर करण्यासाठी एक पथदर्शी गाव निर्माण करणे:-**

अनेक आदिवासी, पेसा आणि इतर गावामध्ये पुरेशा प्रमाणात बांबू उपलब्ध आहे. परंतु बांबूचा वापर हा त्यांच्या पारंपारिक पध्दतीनुसार होत असतो. सुप्रसिध्द वास्तुविशारदाची नियुक्ती करुन त्यांचे ज्ञान व कौशल्याचा वापर करुन गावक-यांसाठी सुधारित गुणवत्तेची घरे तयार करण्यात येतील. त्यामुळे बांबू वापरण्यासाठी इतर गावक-यांना सुध्दा प्रेरणा मिळेल व बांबू हे ग्रामीण भागात इतर पर्यायी सामुग्री म्हणून उपयोगात येईल.

**५. बांबू अगरबत्ती प्रकल्प (गडचिरोली मॉडेल):-**

अगरबत्तीच्या काडीची अत्यंत कमतरता असल्याने ती इतर देशांमधून आयात करावी लागते. अगरबत्तीच्या विकासासाठी चांगले कारागीर असणे आवश्यक आहे. तसेच सदर कामासाठी आवश्यक असलेले मशीन विकसित करण्याची पध्दत प्रमाणित करण्यात आली आहे. कंपनी राज्यातबांबू अगरबत्ती प्रकल्पाला प्रोत्साहन देईल.

**६. मार्केटिंगसाठी वास्तुविशारद व संकल्पचित्रकार यांच्याशी समन्वय:-**

बांबूचे सौदर्य व पर्यावरणस्नेही गुणधर्मामुळे अनेक वास्तुविशारद आणि संकल्पचित्रकार (डिझायनर) बांबू वापरू इच्छितात. परंतु उपचारीत बांबूची सहज उपलब्धता होत नसल्यामुळे व इतर समस्यामुळे त्यांच्या कामात अडथळे येतात.वास्तुविशारद/ संकल्पचित्रकार (डिझायनर) ला आवश्यक असलेली सेवा पुरविण्याची तरतूद असून त्यांना कच्चा माल मिळवून देण्यास सोयीचे होईल.

**७. बांबूची गटलागवड करण्यास प्रोत्साहन:-**

शेतातील बांबू क्षेत्राच्या विकासामध्ये बांबू वाहतूकीसाठी वाहतूक परवाना हा मोठा अडथळा दूर झाला आहे. त्यामुळे बांबूच्या शेतीस प्रोहत्सान मिळणार आहे. या सोयीमुळे सिंचनासोबत किंवा त्या शिवाय शेतातील बांबू लागवडीसाठी मोठया संधी उपलब्ध आहे. कंपनी ही तांत्रिक आणि इतर सहाय्य (शेतक-यांना थेट आर्थिक मदत वगळून) देईल. याकरिता आवश्यकत्या प्रचार प्रसिध्दी व जनजागृती करण्यासाठी तीन वर्षाच्या कालावधी मध्ये रुपये २.५ कोटी चिन्हांकित करण्यात येतील. याकरिता कृषीवानिकी कंपन्याचा सहभाग व मदत घेतली जाणार आहे.

**८. तरूण पिढीला बांबूचा वापर करण्यासाठी प्रोत्साहन देणे:-**

बांबू हा भूतकाळात वापरला जात होता व भविष्यातही वापरलाजाईल असे साहित्य आहे. प्रत्येक वर्षी वास्तुशास्त्र महाविद्यालयाचे काही विद्यार्थी बांबू बाबत अभिरुची दाखवितात. परंतु व्यवसायिक कारकीर्द निर्माण करण्यात असलेले अडथळे यामुळे त्यांची या विषयातील रुची निघून जाते. त्यांना वास्तुविशारद तसेच डिझाईन अभ्यासक्रमाकरिता महाविद्यालयाशी संपर्क साधावा लागतो. या उद्देशासाठी बांबू मॉडेल तयार केले जाईल, जे त्यांना बांबूशी निगडीत असतील. हे चित्रपट, व्हिडिओ, चर्चा इत्यादीचे मिश्रण असू शकते. प्रत्येक वर्षी किमान १० महाविद्यालयांचा समावेश करण्यात येईल. या प्रकियेद्वारे अधिकाधिक तरूण डिझाईन,वास्तुविशारद आणि बांधकाम साहित्याचे संभाव्यता पाहतील. तसेच युवक/वर्तमान डिझाईन संस्थेला फेलोशिप सुध्दा देण्यात येतील.

**९. बांबूसाठी ज्ञान आणि माहिती केंद्र:-**

गेल्या २० वर्षात एनएमबीए, राष्ट्रीय बांबू मिशन, INBAR या संस्थेच्या माध्यमातून बांबू वर मोठया प्रमाणावर काम झाले असून बांबू संदर्भात बरीच ज्ञान कौशल्ये विकसीत झाले आहे. तथापि त्यांचे नियोजनबध्द पध्दतीने जतन करण्यासाठी सक्षम यंत्रणा नसल्याने या माहितीचा ऱ्हास होण्याची शक्यता निर्माण झाली आहे. यासाठी बांबू ज्ञान व माहिती केंद्र स्थापित करुन भविष्यातील वापरासाठी सर्व प्रकाशने, बांबू वरील ऑडीओ, व्हिडिओ रेपॉजिटरीला अभिलेखात कायम स्वरुपी जतन करण्यात येईल.

**१०. लहान उद्योजक आणि व्यवसायासाठी सहाय्य म्हणून कार्य करणे:-**

कंपनी एक वेबसाईट/पोर्टल चालवेल जेथे स्थानिक उद्योजक आणि बांबूच्या क्षेत्रातील माहिती नाममात्र शुल्कासाठी ठेवली जाऊ शकते. यामुळे लहान उद्योजकांना त्यांच्या व्यवसाय वाढीस मदत होईल.

## कंपनी बद्दल इतर तपशील

कंपनीचे व्यवस्थापन, संचालक मंडळाद्वारे करण्यात येईल. संचालक मंडळावर प्रत्येक सदस्याद्वारे एक नामनिर्देशित संचालक असेल.महाराष्ट्र शासनाची कंपनीचे संस्थापक सदस्य म्हणून भूमिका लक्षात घेऊन व भविष्यात विविध प्रकल्पासाठी देण्यात येणारी अपेक्षीत सहाय्यचा विचार करता मंडळामध्ये महाराष्ट्र शासनाचा एक अतिरिक्त संचालक राहील. म्हणजेच शासनाचे दोन संचालक राहतील अशी तरतूद केलेली आहे. या कंपनीचा पहिला अध्यक्ष हा राज्य शासनाचा प्रतिनिधी असेल, त्यांचा कालावधी दोन वर्षाचा असेल. नंतर अध्यक्ष हे परिभ्रमण (rotation) पध्दतीनुसार सदस्यामधून निवडले जातील.

## कंपनीचे अधिकारी

मुख्य कार्यकारी अधिकारी हा संस्थेच्या दैनंदिन व्यवहाराचा प्रमुख असेल. त्यांच्याकडे इतर सहाय्यक अधिकारी आणि कर्मचारी असतील. मुख्य कार्यकारी अधिकारी व इतर कर्मचारी खुल्या बाजारपेठेतून घेतले जातील. मुख्य कार्यकारी अधिकारी व इतर कर्मचारी हे कंपनीचे कर्मचारी असतील. कंपनीचे स्वरुप लहान असल्यामुळे याकरिता कर्मचारी वृंद सुमारे १०-१५ इतकाच असेल, हे कर्मचारी कामाच्या निकडीनुसार कार्यालयात तसेच क्षेत्रीय स्तरावर कार्यरत असतील.

## तपशीलवार वाटचाल (Road map)

या शासन निर्णयास अनुसरुन संस्थापक सदस्यासह कंपनीची कायदेशीररित्या स्थापना करण्याची कार्यवाही करण्यात यावी. त्यांनतर कंपनीचे कार्य सुरू होईल. यासाठी एक तपशीलवार व्यावसायिक आराखडा आखला जाईल व त्याची अंमलबजावणी केली जाईल.

## कंपनी स्थापनेस शासनाचा सहभाग

कंपनी स्थापनेसाठी सन २०१८-१९ च्या अर्थसंकल्पात एक वेळ अनुदान म्हणून रु.२० कोटी अनुदान मंजूर करण्यात येत आहे. सदर खर्च २४०६ A१८५ या लेखाशिर्षांखाली करण्यात येईल.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने आणि वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्रमांक:२२३/२०१८/व्यय-१०, दिनांक २९.०६.२०१८ व मा.मंत्रिमंडळाच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८२४१६०९२८५६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sujay Dodal

Digitally signed by Sujay Dodal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=353112ee0fa47f9ff9bedae88f651d09fdb142df5fbce9c004f7eea06d8b9baf, cn=Sujay Dodal
Date: 2018.08.24 17:42:51 +05'30'

**(सुजय दोडल)**
सह सचिव (वने)
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.राज्यमंत्री (वने) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव, उद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. अपर मुख्य सचिव, कृषी विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान सचिव, आदिवासी विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. प्रधान सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. महासंचालक, माहिती व प्रसिध्दी, मंत्रालय, मुंबई.
१२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (उत्पादन व व्यवस्थापन), महाराष्ट्र राज्य, नागपूर
१४. प्रधान मुख्य वनसंरक्षक (सामाजिक वनीकरण),महाराष्ट्र राज्य, पुणे.
१५. व्यवस्थापकीय संचालक, एफ.डी.सी.एम.लिमिटेड, नागपूर.
१६. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र बांबू विकास मंडळ, नागपूर
१७. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
१८. व्यवस्थापकीय संचालक, एम.एस.एस.आय.डी.सी. मुंबई.
१९. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र खादी व्हिलेज इंडस्ट्रीज कॉरपोरेशन
२०. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र हस्त शिल्प व हस्तमाग शिल्प महामंडळ
२१. टाटा ट्रस्ट, वल्डट्रेड सेंटर, कफ परेड,मुंबई-४०० ००५.
२२. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षण, लेखावअनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
२३. वित्त विभाग (व्यय-१०), मंत्रालय, मुंबई-३२
२४. नियोजनविभाग (कार्यासन-१४७५), मंत्रालय, मुंबई-३२
२५. निवड नस्ती, फ-९ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२